मौजे कुंडल ता. पलूस जि. सांगली येथील “कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने)” या अकादमीमधील पदांचा वेतन व भत्यांचा खर्च भागविणेबाबत चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एफडीएम-२०१४/प्र.क्र.१८६/फ-२**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
मंत्रालय, मुंबई-३२
तारीख: ०६ फेब्रुवारी, २०१५

वाचा -

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.०१.०७.२०१४.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.५१/७२७, दि.३०.०७.२०१४.

३) महसूल व वन विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.एफडीएम-२०१४/प्र.क्र.१८६/फ-२, दि.११.०८.२०१४.

प्रस्तावना :-

सन २०१४-१५ करिता मौजे कुंडल ता. पलुस जि. सांगली येथील “वन विभागात वन प्रशिक्षण केंद्राची स्थापना (४४१५ ०१७२)” या लेखाशीर्षाअंतर्गत एकूण रु.५००.५७ लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून त्यापैकी रु.३५०.४० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ वरील दि.०१.०७.२०१४ रोजीच्या परिपत्रकानुसार योजनेत्तर व योजनांतर्गत चालू बाब प्रस्तावास अर्थसंकल्पित निधीच्या ६० % च्या मर्यादेत निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

२. त्याअनुषंगाने, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.२ वरील दि.३०.०७.२०१४ च्या पत्रान्वये रु.३३४.६७ लक्ष रक्कमेचा चालू प्रस्ताव या विभागास प्राप्त झालेला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने रु.१०७.२८ लक्ष इतका निधी या विभागाच्या संदर्भ क्र.३ वरील दि.११.०८.२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरित केलेला असून उर्वरित निधी वितरित करावयाची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

३. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथिल दि.०१.०७.२०१४ च्या परिपत्रकात दिलेल्या सूचनेनुसार "कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने)" कुंडल या अकादमीमधील पदांवरील वेतन व भत्यांचा खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्पित निधीच्या ६० % मर्यादेत खालीलप्रमाणे निधीचे उद्दिष्टनिहाय वाटप करण्यात येत असून सदर निधी वितरीत व खर्च करण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

(रक्कम रु.लाखात)

| उद्दिष्ट | प्रस्तावा प्रमाणे मागणी केलेली रक्कम | अर्थसंकल्पित निधी | पुनर्वितरणा द्वारे उपलब्ध केलेला निधी | पुनर्वितरणा नंतर होणारी सुधारीत तरतूद (३+४) | दि.११.०८.१४ च्या शासन निर्णयान्वये वितरित केलेली रक्कम | **या शासन निर्णयान्वये वितरित करावयाची रक्कम** |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | **७** |
| ०१ वेतन | १७५.१७ | १४३.८० | ०.०० | १४३.८० | ८६.२८ | **०.००** |
| ५० इतर खर्च | १५९.५० | ३५.०० | (+) ९१.२२ | १२६.२२ | २१.०० | **१०२.९६** |
| **एकूण** | **३३४.६७** | **१७८.८०** | | **२७०.०२** | **१०७.२८** | **१०२.९६** |

४. उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधानशीर्ष - ४४१५ - कृषि विषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, २७७- शिक्षण, (००) (०५) - वन विभागात वन प्रशिक्षण केंद्राची स्थापना (४४१५ ०१७२) या या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ करिता उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या दि.०१.०७.२०१४ चे शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांस अनुसरुन व वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/ २००८/विनियम, दि. १५.०५.२००९ भाग पहिला उपविभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०६१७२३४८३५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.02.06 18:20:49 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) / (कार्मिक), म.रा.नागपूर.

३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर.

४) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.

५) महासंचालक, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), मौजे.कुंडल, ता.पलूस, जि.सांगली.

६) प्राचार्य, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), मौजे.कुंडल, ता.पलूस, जि.सांगली.

७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

८) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

९) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

१०) जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, सांगली/कोल्हापूर/पुणे

११) फ-९/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) निवडनस्ती , फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.